श्री

# शिवस्वरोदय.

ह्याचें संस्कृत मूळपुस्तक शुद्ध करून,

वे० शा० सं० वामन एकनाथ शास्त्री
केमकर ह्यांजकडून करविलेल्या
मराठी भाषांतरासहित,

हा ग्रंथ,

पुणें, पेठ शनिवार, मेहुणपुरा येथें रावजी श्रीधर गोंधळेकर याणीं आपले "जगद्धितेच्छु" छापखान्यांत छापिला.

किमत ८१० आणे; ट० ख० ८२ दोन आणे.



ता० १९ एप्रिल सन १८९२.

आवृत्ति ४ थी.

# प्रस्तावना.

शिवस्वरोदय शास्त्र हें योगाशास्त्राचें अंग होय. यांतील विषय ज्योतिषशास्त्राप्रमाणें सर्वोपयोगी असून त्याचा प्रचार नसल्यामुळें त्यापासून होणारा लाभ न होतां त्याचें नांवही बहुतेकांस विदित नाहींसें झालें आहे. याचें कारण, हा ग्रंथ संस्कृत भाषेंत असून यांत सांगितलेल्या प्रकरणांस मुख्य आधार स्वराचा आहे. ह्मणून स्वरज्ञान नसल्यामुळें संस्कृतज्ञांची आणि भाषाज्ञानाच्या अभावामुळें इतरांची या विषयांत प्रवृत्ति होत नाहीं असें जाणून ती अडचण दूर होण्यासाठीं सदरील ग्रंथाचें मराठी भाषांतर करून तें मूळासहित छापलें आहे. आतां स्वरज्ञानाचें रहस्य गुरुमुखावांचून स्पष्ट समजणार नाहीं हें खरें आहे, तथापि स्वरसंबंधीं कांहीं उपयुक्त माहिती भाषांतरांत दिली आहे. तीवरून साधारण स्वरज्ञान होईल.

यांत स्वर, तत्त्वें, युद्ध, ध्यान, वशीकरण, गर्भाधान, संवत्सरफल, रोग आणि मरण याविषयींचा निर्णय केला आहे. कोणते स्वरावर कोणतीं कृत्यें केलीं असतां सिद्धि होते, व कोणत्या कार्यास कोणता स्वर वर्ज्य, हा विचार थोडक्यांत असून अनुभवशीर सांगितलेला आहे. याकरितां या ग्रंथास सर्व लोक आपला उदार आश्रय देऊन आमच्या श्रमाचें साफल्य करतील अशी आशा आहे. या ग्रंथाचा खप बरासा झाल्यास आणखी कांहीं स्वरोदय आहेत त्यांचेंही भाषांतर करण्यास आह्मांस उमेद येईल.

रावजी श्रीधर गोंधळेकर.

# अनुक्रमणिका.



इति शिवस्वरोदयस्यानुक्रमणिका.

। श्रीः ।

। श्रीगणेशायनमः ।

अथ

# शिवस्वरोदयः प्रारभ्यते ।

महेश्वरंनमस्कृत्यशैलजांगणनायकम् ॥
गुरुंचपरमात्मानंभजेसंसारतारणम् ॥ १ ॥

अर्थ—शंकर, पार्वती आणि गणपति यांस नमस्कार करून संसारसमुद्रतारक जो सद्गुरु व परमात्मा यांस मी भजतों.

देव्युवाच ॥ देवदेवमहादेवकृपांकृत्वाममोपरि ॥
सर्वसिद्धिकरंज्ञानंकथयस्वममप्रभो ॥ २ ॥

अर्थ—देवी ( पार्वती ) शंकरास ह्मणते.—हे देवाधिदेवा शंकरा, मजवर कृपा करून सर्व कार्यांची सिद्धि करणारें ज्ञान मला सांगा.

कथंब्रह्मांडमुत्पन्नंकथंवापरिवर्त्तते ॥
कथंविलीयतेदेववदब्रह्मांडनिर्णयम् ॥ ३ ॥

अर्थ—हे देवा, हें ब्रह्मांड कसें उत्पन्न झालें, याची स्थिति ( पोषण ) कशानें होतें, आणि याचा लय कसा होतो, हा ब्रह्मांडाविषयींचा निर्णय मला सांगा.

ईश्वरउवाच ॥ तत्त्वाद्ब्रह्मांडमुत्पन्नंतत्त्वेनपरिवर्तते॥
तत्त्वेविलीयतेदेवितत्त्वाद्ब्रह्मांडनिर्णयः ॥ ४ ॥

अर्थ—शंकर ह्मणतात, हे देवि तत्त्वापासून ब्रह्मांड उत्पन्न होतें, तत्त्वावरच याची स्थिति आहे, आणि तत्त्वाचे ठिकाणींच याचा लय होतो, या ब्रह्मांडाचा निर्णयही तत्त्वापासूनच समजतो.

देव्युवाच ॥ तत्त्वमेवपरंमूलंनिश्चितंतत्त्ववादिभिः ।
तत्त्वस्वरूपंकिंदेवतत्त्वमेवप्रकाशय ॥ ५ ॥

अर्थ–देवी ह्मणते, तत्त्वच ब्रह्मांडाचें मूळ आहे असा तत्त्ववादी निश्चय करतात, परंतु तत्त्व कोणतें, त्याचें स्वरूप काय? हें मला स्पष्ट कळेल असें आपण मला सांगावें.

ईश्वरउवाच ॥ निरंजनोनिराकारएकोदेवोमहेश्वरः ॥
तस्मादाकाशमुत्पन्नमाकाशाद्वायुसंभवः ॥ ६ ॥

अर्थ–मायारहित, निराकार, स्वयंप्रकाश, एक, सर्वांतर्यामी जो परमात्मा त्यापासून आकाश उत्पन्न झालें. आकाशापासून वायु उत्पन्न झाला.

वायोस्तेजस्ततश्चापस्ततःपृथ्वीसमुद्भवः ॥
एतानिपंचतत्त्वानिविस्तीर्णानिचपंचधा ॥ ७ ॥

अर्थ–वायूपासून तेज, तेजापासून उदक आणि उदकापासून पृथ्वी, याप्रमाणें उत्पन्न झालेलीं हीं पांच तत्त्वें प्रत्येक पांच पांच प्रकारांनीं विस्तार पावलीं आहेत.

तेभ्योब्रह्मांडमुत्पन्नंतैरेवपरिवर्त्तते ॥ विलीयते
चतत्रैवतत्रैवरमतेपुनः ॥ ८ ॥

अर्थ–त्या तत्त्वांपासून हें ब्रह्मांड उत्पन्न झालें, त्याच्याच योगानें याची स्थिति होते, आणि हें त्या तत्त्वांतच शेवटीं लीन होऊन राहतें.

पंचतत्त्वमयेदेहेपंचतत्त्वानिसुंदरि ॥ सूक्ष्मरूपेण
वर्त्तंतेज्ञायंतेतत्त्वयोगिभिः ॥ ९ ॥

अर्थ–हे सुंदरि, या पंचतत्त्वांपासून उत्पन्न झालेल्या देहांत पांच तत्त्वें सूक्ष्मरूपानें आहेत त्यांस योगी जाणतात.

अथस्वरंप्रवक्ष्यामिशरीरस्थस्वरोदयम् ॥ हंसचा-

रस्वरूपेणभवेज्ज्ञानंत्रिकालजम् ॥ १० ॥

अर्थ–आतां अकारादिस्वरांच्या उच्चारास मूलकारण जो शरीरस्थ स्वर त्याविषयीं सांगतों; जें स्वरज्ञान झालें असतां हंसचार ( श्वास बाहेर येतांना व आंत जातांना क्रमानें हं आणि स असा उच्चार होतो तो ) याच्या स्वरूपावरून योगी जनांस भूत, भविष्य आणि वर्त्तमान या त्रिकालांचें ज्ञान होतें.

गुह्याद्गुह्यतरंसारमुपकारप्रकाशनम् ॥ इदंस्वरोदयज्ञानंज्ञानानांमस्तकेमणिः ॥ ११ ॥

अर्थ–अत्यंत गोप्य, सर्वोपकारक आणि सारभूत हें स्वरोदयाचें ज्ञान सर्व ज्ञानांत केवळ शिरोमणि होय.

सूक्ष्मात्सूक्ष्मतरंज्ञानंसुबोधंसत्यप्रत्ययम् ॥
आश्चर्यंनास्तिकेलोकेआधारंत्वास्तिकेजने ॥१२॥

अर्थ–हें स्वरज्ञान अत्यंत सूक्ष्म असून अत्यंत सुबोध आणि सत्यत्वानें प्रतीतीस येणारें आहे. नास्तिक लोकांनाही आश्चर्य करणारें, हें ज्ञान आस्तिकजनांस मोठा आधारच होय.

## अथशिष्यलक्षणं.

शांतेशुद्धेसदाचारेगुरुभक्त्येकमानसे ॥ दृढचित्ते कृतज्ञेचदेयंचैवस्वरोदयम् ॥ १३ ॥

अर्थ–शांत, शुद्ध, आचारसंपन्न, गुरुभक्तिविषयीं तत्पर, दृढमनाचा आणि कृतज्ञ ( उपकाराचें स्मरण ठेवणारा ) अशा शिष्यास ह्या स्वरज्ञानाचा उपदेश करावा.

दुष्टेचदुर्जनेक्रुद्धेनास्तिकेगुरुतल्पगे ॥ हीनसत्वेदुराचारेस्वरज्ञानंनदीयते ॥ १४ ॥

अर्थ–दुष्ट, दुर्जन, क्रोधी, अविश्वासि, गुरुस्त्रीशीं गमन करणारा,

धैर्यहीन व दुराचारी, अशा शिष्यास स्वरज्ञान देऊं नये.

शृणुत्वंकथितंदेविदेहस्थंज्ञानमुत्तमम् ॥ येनवि-
ज्ञातमात्रेणसर्वज्ञत्वंप्रणीयते ॥ १५ ॥

अर्थ—हे देवि, आपले शरीरांत असलेल्या स्वराविषयीं ज्ञान मी सांगतों तें तूं ऐक, या स्वरज्ञानाच्या योगानें सर्व ज्ञान प्राप्त होतें.

स्वरेवेदाश्चशास्त्राणिस्वरेगांधर्वमुत्तमम् ॥ स्वरे
चसर्वंत्रैलोक्यंस्वरमात्रस्वरूपकम् ॥ १६ ॥

अर्थ—सर्व वेद, शास्त्रें आणि गायन, हीं स्वराच्या आश्रयानेंच आहेत; किंबहुना सर्व त्रैलोक्य स्वराचे ठिकाणीं आहे. व स्वर हें सर्व जगाचें स्वरूप होय.

स्वरहीनश्चदैवज्ञोनाथहीनंयथागृहम् ॥ शास्त्र-
हीनंयथावक्त्रंशिरोहीनंचयद्वपुः ॥ १७ ॥

अर्थ—स्वामीवांचून जसें घर, शास्त्रसंस्कारावांचून जसें मुख, अथवा शिरावांचून जसें शरीर, त्याप्रमाणें स्वरज्ञानाशिवाय ज्योतिषी शोभत नाहीं.

नाडीभेदंतथाप्राण-तत्त्वभेदंतथैवच ॥ सुषुम्ना-
मिश्रभेदंचयोजानातिसमुक्तिगः ॥ १८ ॥

अर्थ—सर्व नाडींचा भेद, प्राणतत्त्वांतील भेद व सुषुम्नादि जें नाडीत्रय त्यांतील भेद जो जाणतो तो मुक्तीस जातो.

साकारेवानिराकारेशुभवायुबलीकृते ॥ कथयं-
तिशुभंकेचित्स्वरज्ञाने वरानने ॥ १९ ॥

अर्थ—स्वरज्ञात्यांमध्यें कोणी ह्मणतात कीं, साकार (व्यावहारिक) आणि निराकार (पारमार्थिक) कर्मास शुभवायूचें बळ प्रशस्त होय. कोणी पारमार्थिक कृत्यास वायुबळाची गरज नाहीं ह्मणतात.

ब्रह्मांडखंडपिंडाद्याःस्वरेणैवहिनिर्मिताः ॥ सृष्टि-
संहारकर्त्ताचस्वरःसाक्षान्महेश्वरः ॥ २० ॥

अर्थ-सर्व ब्रह्मांड व पिंड हे स्वरापासूनच निर्माण झाले; जगाची सृष्टि व संहार यांचाकर्त्ता जो ईश्वर तोही स्वररूपच आहे.

स्वरज्ञानात्परंगुह्यंस्वरज्ञानात्परंधनम् ॥ स्वरज्ञा-
नात्परंज्ञानंनवादृष्टंनवाश्रुतम् ॥ २१ ॥

अर्थ-स्वरज्ञानासारखें दुसरें गुह्य कांहीं नाहीं; स्वरज्ञान हेंच मुख्य धन होय; स्वरज्ञानापेक्षां श्रेष्ठ ज्ञान तर कोठें पाहण्यांत नाहीं व ऐकण्यांतही नाहीं.

शत्रुंहन्यात्स्वरबलेतथामित्रसमागमः ॥ लक्ष्मी-
प्राप्तिःस्वरबलेकीर्तिःस्वरबलेसुखम् ॥ २२ ॥

अर्थ-स्वरज्ञानाच्या बळानें शत्रुनाश, मित्रसमागम, लक्ष्मीप्राप्ति,कीर्ति आणि सुख हीं फळें प्राप्त होतात.

कन्याप्राप्तिःस्वरबलेस्वरतोराजदर्शनम् ॥ स्वरेण
देवतासिद्धिः स्वरेणक्षितिपोवशः ॥ २३ ॥

अर्थ-स्वरबलानें कन्यापुत्रादि संतति प्राप्त होते, स्वरानें राजदर्शन होतें, स्वरानें देवतासिद्धि होते, आणि स्वरज्ञानानें राजा वश होतो.

स्वरेणगम्यतेदेशोभोज्यंस्वरबलेतथा ॥ लघुदीर्घं
स्वरबलेमलंचैवनिवारयेत् ॥ २४ ॥

अर्थ-स्वरबलावर देशाटन करावें, स्वरबलानें भोजन करावें, स्वराचे बळानें लघुशंका व मलत्याग करावा.

सर्वशास्त्रपुराणादिस्मृतिवेदांगपूर्वकम् ॥ स्वरज्ञा-
नात्परंतत्त्वंनास्तिकिंचिद्वरानने ॥ २५ ॥

अर्थ-हे सुंदरी, सर्व शास्त्रें, पुराणें, स्मृति आणि वेदांगें यांत स्वर-

ज्ञानाहून श्रेष्ठ तत्त्व कांहींएक नाहीं.

नामरूपादिकःसर्वोमिथ्यासर्वेषुविभ्रमः ॥ अज्ञान मोहितामूढायावत्तत्त्वंनविद्यते ॥ २६ ॥

अर्थ-सर्व पदार्थमात्राचेठिकाणीं नामरूपादिक हा केवळ भ्रम होय जोंपर्यंत स्वररूपतत्त्वाचें ज्ञान नाहीं, तोंपर्यंत हे जीव अज्ञानानें मोहित झालेले ह्मणून मूढ होत.

इदंस्वरोदयंशास्त्रंसर्वशास्त्रोत्तमोत्तमम् ॥ आत्मघटप्रकाशार्थंप्रदीपकलिकोपमम् ॥ २७ ॥

अर्थ-हें स्वरोदयशास्त्र सर्व शास्त्रांत उत्तमोत्तम होय. आत्मा ( पंचकोशात्मक जीव ) हाच कोणीएक कुंभ, यांत प्रकाश करणारें हें स्वरशास्त्र केवळ महादीपाच्या ज्वाळेप्रमाणें होय.

यस्मैकस्मैपरस्मैवानप्रोक्तंप्रश्नहेतवे ॥ तस्मादेतत्स्वयंज्ञेयमात्मनोवाऽत्मनाऽत्मनि ॥ २८ ॥

अर्थ-हें स्वरोदयशास्त्र केवळ कोणी दुसरे प्रश्न करतील, त्यांकरतांच सांगितलें आहे असें नाहीं. तर हें आपलें आपण आपले ठिकाणींच जाणावें.

नतिथिर्नचनक्षत्रंनवारोग्रहदेवताः ॥ नचविष्टिर्व्यतीपातोवैधृत्याद्यास्तथैवच ॥ २९ ॥

अर्थ-या स्वरोदय शास्त्रांत विशेष तिथि, नक्षत्र, वार, ग्रह आणि देवता हें कांहीं नाहीं; यांत भद्रा, व्यतीपात वैधृति इत्यादि कुयोगांचा दोष नाहीं.

कुयोगोनास्तिकोदेविभावितावाकदाचन ॥ प्राप्तेस्वरबलेशुद्धेसर्वमेवशुभंफलम् ॥ ३० ॥

अर्थ-हे पार्वति, या स्वरशास्त्रांत कोणताही कुयोग मुळींच नाहीं, व पुढेंही उत्पन्न होणार नाहीं; स्वराचें बळ निर्मळतेनें प्राप्त झालें अ-

सतां सर्व शुभ फलच प्राप्त होतें.

देहमध्येस्थितानाड्योबहुरूपाःसुविस्तरात् ॥ ज्ञातव्याश्चबुधैर्नित्यंस्वदेहज्ञानहेतवः ॥ ३१ ॥

अर्थ–देहामध्यें अनेक रूपानें ज्या नाडी आहेत, त्या सुज्ञ पुरुषांनीं आधीं सविस्तर जाणाव्या, ह्मणजे शारीरज्ञान होण्यास तें नाडीज्ञान कारण होतें.

नाभिस्थानगकंदोर्ध्वमंकुरादेवनिर्गताः ॥ द्विसप्ततिसहस्राणिदेहमध्येव्यवस्थिताः ॥ ३२ ॥

अर्थ–नाभिस्थानीं असलेल्या कंदापासून निघालेला जो अंकुर त्यांतून बहात्तर हजार नाड्या निर्माण झाल्या; त्या सर्व शरीरांत आहेत.

नाडीस्थाकुंडलीशक्तिर्भुजंगाकारशायिनी ॥ ततोदशोर्ध्वगानाड्योदशैवाधःप्रतिष्ठिताः ॥ ३३ ॥

अर्थ–या नाडींत भुजंगाप्रमाणें शयन करणारी एक कुंडली नामक शक्ति आहे,तिच्यावर दहा नाड्या आहेत, आणि खालीं दहा नाड्या आहेत.

द्वेद्वेतिर्यग्गतेनाड्यौचतुर्विंशतिसंख्यया ॥ प्रधानादशनाड्यस्तुदशवायुप्रवाहिकाः ॥ ३४ ॥

अर्थ–दोन बाजूंस दोन दोन मिळून चार वांकड्या गेलेल्या नाड्या आहेत. या व पहिल्या २० मिळून २४. त्यांत दहा वायूंस वाहणाऱ्या ज्या १० नाड्या त्या मुख्य ेत.

तिर्यगूर्ध्वास्तथाऽधःस्थावायुदेहसमन्विताः ॥चक्रवत्संस्थितादेहेसर्वाःप्राणसमाश्रिताः ॥ ३५ ॥

अर्थ–वांकड्या, वर गेलेल्या व खालीं असलेल्या सर्व नाड्या वायुसहित देहांत चक्राप्रमाणें राहिल्या आहेत, आणि त्या सर्वांस प्राणाचा आश्रय आहे.

तासांमध्येदशश्रेष्ठादशानांतिस्रउत्तमाः ॥ इडा
चपिंगलाचैवसुषुम्नाचतृतीयका ॥ ३६ ॥

अर्थ-त्या सर्व नाड्यांत दहा श्रेष्ठ होत. त्या दहांतही इडा, पिंगला आणि सुषुम्ना या तीन मुख्य होत.

गांधारीहस्तिजिव्हाचपूषाचैवयशस्विनी ॥ अलंबुषाकुहूश्चैवशंखिनीदशमीतथा ॥ ३७ ॥

अर्थ-चौथी गांधारी, पांचवी हस्तिजिव्हा, सहावी पूषा, सातवी यशस्विनी, आठवी अलंबुषा, नववी कुहू आणि दहावी शंखिनी, याप्रमाणें दहा नाड्या जाणाव्या.

इडावामेस्थिताभागेपिंगलादक्षिणेस्मृता ॥
सुषुम्नामध्यदेशेतुगांधारीवामचक्षुषि ॥ ३८ ॥

अर्थ-इडा वामभागीं आहे, पिंगला दक्षिणभागीं आहे, सुषुम्ना मध्यप्रदेशीं आणि गांधारी वामनेत्राचे ठिकाणीं आहे.

दक्षिणेहस्तिजिव्हाचपूषाकर्णेचदक्षिणे ॥
यशस्विनीवामकर्णेआननेचाप्यलंबुषा ॥ ३९ ॥

अर्थ-हस्तिजिव्हा उजव्या नेत्राचे ठिकाणीं, पूषा उजव्या कानात, यशस्विनी वामकर्णांत, आणि अलंबुषा मुखाचे ठायीं वास करते.

कुहूश्चलिंगदेशेतुमूलस्थानेतुशंखिनी ॥
एवंद्वारंसमाश्रित्यतिष्ठंतिदशनाडिकाः ॥ ४० ॥

अर्थ-कुहू लिंगाचेठायीं व शंखिनी मूलस्थानीं ( गुदस्थानीं ) वास्तव्य करते. याप्रमाणें दहा नाड्या शरीरद्वारांचा आश्रय करून राहतात

इडापिंगलासुषुम्नाचप्राणमार्गेसमाश्रिताः ॥
एताहिदशनाड्यस्तुदेहमध्येव्यवस्थिताः ॥ ४१ ॥

अर्थ-इडा, पिंगला आणि सुषुम्ना, या तीन नाड्या प्राणमार्गाचा

आश्रय करून राहतात, याप्रमाणें दहा नाड्या शरीरांतील मुख्य होत.

नामानिनाडिकानांतुवातानांतुवदाम्यहम् ॥
प्राणोऽपानःसमानश्चउदानोव्यानएवच ॥ ४२ ॥

अर्थ-आतां नाड्यांस आश्रयभूत जे शरीरस्थवायु त्यांचीं नांवें सांगतों. प्राण, अपान, व्यान, उदान व समान हे पांच वायु मुख्य होत.

नागःकूर्मोऽथकृकलोदेवदत्तोधनंजयः ॥ हृदिप्राणोवसेन्नित्यमपानोगुदमंडले ॥ ४३ ॥

अर्थ-नाग, कूर्म, कृकल, देवदत्त आणि धनंजय हे पांच उपप्राण होत. आतां या दहा वायूंचीं स्थानें सांगतों.-प्राण नेहमीं हृदयाचे ठिकाणीं राहतो, आणि अपान गुदस्थानीं राहतो.

समानोनाभिदेशेतुउदानःकंठमध्यगः ॥ व्यानो व्यापीशरीरेषुप्रधानादशवायवः ॥ ४४ ॥ प्राणाद्याः पंचविख्याता नागाद्याःपंचवायवः ॥ तेषामपिचपंचानांस्थानानिचवदाम्यहम् ॥ ४५ ॥

अर्थ-समान वायु नाभिस्थानीं, उदान कंठमध्याचे ठिकाणीं आणि व्यान सर्व शरीराचेठायीं रहातो, याप्रमाणें हे दहा वायु मुख्य होत.

अर्थ-प्राणादिक पांच वायूंचीं स्थानें सांगितलीं. आतां नागादिक पांच वायूंचीं स्थानें सांगतों.

उद्गारेनागआख्यातः कूर्मउन्मीलनेस्मृतः ॥ कृकलःक्षुतकृज्ज्ञेयोदेवदत्तोविजृंभणे ॥ ४६ ॥

अर्थ-नागवायु ढेंकर आणणारा होय, कूर्म नेत्रोन्मीलनकर्ता, कृकल हा शिंक आणणारा, आणि देवदत्त हा जांभई देणारा होय. हे वायु स्वस्थानीं राहून आपआपले व्यापार करतात.

नजहातिमृतंवापिसर्वव्यापीधनंजयः ॥ एतेनाडी-

षुसर्वासुभ्रमंतेजीवरूपिणः ॥ ४७ ॥

अर्थ-धनंजय नांवाचा वायु मात्र सर्व शरीरभर व्याप्त असून तो मरणानंतरही शरीरास सोडीत नाहीं. याप्रमाणें हे वायु जीवरूपानें सर्व नाड्यांत भ्रमण करतात.

प्रकटंप्राणसंचारंलक्षयेद्देहमध्यतः ॥ इडापिं-
गलासुषुम्नाभिर्नाडीभिस्तिसृभिर्बुधः ॥ ४८ ॥

अर्थ-बुद्धिमान् पुरुषानें देहाचे आंत प्राण संचार होतो तो इडा, पिंगला व सुषुम्ना या तीन नाड्यांवरून जाणावा.

इडावामेचविज्ञेयापिंगलादक्षिणेस्मृता ॥ इडानाडी
स्थितावामाततोऽव्यस्ताचपिंगला ॥ ४९ ॥

अर्थ-इडानाडी वामभागीं आहे व पिंगला दक्षिणभागीं आहे; ह्मणून सामान्यतः ज्या डाव्या नाड्या त्या साऱ्या इडा, आणि उजव्या पिंगला जाणाव्या.

इडायांतुस्थितश्चंद्रःपिंगलायांचभास्करः ॥ सुषुम्ना
शंभुरूपेणशंभुर्हंसस्वरूपतः ॥ ५० ॥

अर्थ-इडानाडीचे ठिकाणीं चंद्र आहे, पिंगलेच्या ठिकाणीं सूर्य आहे आणि सुषुम्नेच्या ठिकाणीं हं आणि स अशा मिश्ररूपानें साक्षात् शंभु वास्तव्य करतो.

हकारोनिर्गमेप्रोक्तःसकारेणप्रवेशनम् ॥ हकारःशि-
वरूपेणसकारःशक्तिरुच्यते ॥ ५१ ॥

अर्थ-स्वर निघतांना हकाराचें उच्चारण होतें आणि पुनः आंत जातांना सकारपूर्वक जातो; त्यांत हकार हें शिवाचें रूप, आणि सकार हें शक्तिरूप जाणावें.

शक्तिरूपस्थितश्चंद्रोवामनाडीप्रवाहकः ॥ दक्षना-

डीप्रवाहश्चशंभुरूपोदिवाकरः ॥ ५२ ॥

अर्थ-वामनाडीस वाहविणारा चंद्र शक्तिरूपी होय, दक्षिणनाडीचा प्रवाहक जो सूर्य तो शंभुरूपी होय.

श्वासेसकारसंस्थेतुयद्दानंदीयतेबुधैः ॥ तद्दानंजीव-
लोकेऽस्मिन्कोटिकोटिगुणंभवेत् ॥ ५३ ॥

अर्थ-श्वास सकाराचे ठिकाणीं असतां जें दान द्यावें तें या लोकांत कोटिकोटिगुण फलप्रद होतें.

अनेनलक्षयेद्योगीचैकचित्तःसमाहितः ॥ सर्वमेव
विजानीयान्मार्गेवैचंद्रसूर्ययोः ॥ ५४ ॥

अर्थ-या क्रमानें योगीपुरुषानें निश्चळ चित्त करून चंद्रसूर्यनाडींच्या मार्गावरूनच सर्व जाणावें.

ध्यायेत्तत्त्वंस्थिरेजीवेअस्थिरेनकदाचन ॥ इष्टसि-
द्धिर्भवेत्तस्यमहालाभोजयस्तथा ॥ ५५ ॥

अर्थ-जीव स्थिर असतां तत्त्वचिंतन करावें. जेव्हां चित्त अस्वस्थ असतें तेव्हां करूं नये. जो स्थिरमनानें तत्त्व शोधन करतो त्यास इष्टसिद्धि, महालाभ आणि जय हीं प्राप्त होतात.

चंद्रसूर्यसमभ्यासंयेकुर्वंतिसदानरा. ॥ अतीताना-
गतज्ञानंतेषांहस्तगतंभवेत् ॥ ५६ ॥

अर्थ-जे पुरुष चंद्र आणि सूर्य यांचा चांगल्या प्रकारें अभ्यास करतात त्यांस भूतभविष्य ज्ञान हस्तगत होतें.

वामेचामृतरूपास्याज्जगदाप्यायनंपरम् ॥ दक्षिणे
चरभागेनजगदुत्पादयेत्सदा ॥ ५७ ॥

अर्थ-वामभागीं जी नाडी (इडा) ती अमृतरूपानें सर्व जगास आ-

प्यायन ह्मणजे पुष्टि करणारी होय, दक्षिणेस जी पिंगला नाडी ती चरभागेंकरून सर्व जगास उत्पन्न करते.

मध्यमाभवतिक्रूरादुष्टासर्वत्रकर्मसु ॥ सर्वत्रशुभका-
र्येषुवामाभवतिसिद्धिदा ॥ ५८ ॥

अर्थ-मधली जी सुषुम्नानाडी ती सर्व कर्मांविषयीं निंद्य आणि क्रूर होय, आणि वामनाडी सर्व शुभकार्यांत सिद्धिप्रद होय.

निर्गमेतुशुभावामाप्रवेशेदक्षिणाशुभा ॥ चंद्रः
समस्तुविज्ञेयोरविस्तुविषमः सदा ॥ ५९ ॥

अर्थ-घरांतून बाहेर निघतांना वामनाडी शुभ होय, प्रवेशाकालीं दक्षिणनाडी प्रशस्त होय. चंद्र सम आणि रवि विषम होय.

चंद्रःस्त्रीपुरुषःसूर्यश्चंद्रोगौरोऽसितोरविः ॥ चं-
द्रनाडीप्रवाहेणसौम्यकार्याणिकारयेत् ॥ ६० ॥

अर्थ-चंद्र स्त्री आणि सूर्य पुरुष, चंद्र गौरवर्ण व सूर्य नीलवर्ण होय, याकरितां सर्व सौम्य कार्यें चंद्रस्वरावर करावीं.

सूर्यनाडीप्रवाहेणरौद्रकर्माणिकारयेत् ॥ सुषु-
म्नायाःप्रवाहेणभक्तिमुक्तिफलानिच ॥ ६१ ॥

अर्थ-सूर्यनाडी प्रवाहानें उग्र कर्मैं करावीं. आणि सुषुम्नेच्या प्रवाहानें भक्तिमुक्तिफलदायक कर्मैं करावीं.

आदौचंद्रःसितपक्षेभास्करोहिसितेतरे ॥ प्र-
तिपत्तोदिनान्याहुस्त्रीणित्रीणिकृतोदयौ ॥ ६२ ॥

अर्थ-शुक्लपक्षीं आधीं चंद्र आणि कृष्णपक्षीं आधीं सूर्य अशा क्रमानें प्रतिपदेपासून तीन तीन दिवस चंद्र व सूर्य या स्वरांचे उदय बलिष्ट होत.

सार्धद्विघटिकेज्ञेयःशुक्लेकृष्णेशशीरविः ॥ वहत्येक-
दिनेनैवयथाषष्ठिघटीःक्रमात् ॥ ६३ ॥

अर्थ-चंद्र व सूर्य हे स्वर क्रमानें शुक्ल व कृष्ण या पक्षीं प्रत्येक २॥ अडीच घटका वाहतात. याप्रमाणें २४ आवृत्ति एक अहोरात्रींत ( ६० घटिकांत ) होतात.

वहेयुस्तद्घटीमध्येपंचतत्त्वानिनिर्दिशेत् ॥ प्रति-
पत्तोदिनान्याहुर्विपरीतेविवर्जयेत् ॥ ६४ ॥

अर्थ-त्या प्रत्येक आवृत्तींतील २॥ घटिकांत पंचतत्त्वें वाहतात. ज्या प्रतिपदेस आधीं चंद्राचा उदय सांगितला आहे, तेव्हां सूर्योदय किंवा सूर्याचे वेळेस चंद्र असें वैपरीत्य झाल्यास अशुभ होय.

शुक्लपक्षेभवेद्वामाकृष्णपक्षेचदक्षिणा ॥ जानी-
यात्प्रतिपत्पूर्वयोगीतद्यतमानसः ॥ ६५ ॥

अर्थ-शुक्लपक्षीं प्रतिपदेस पूर्वी चंद्र व कृष्णपक्षीं आधीं सूर्य शुभ होय. यासाठीं योगी पुरुषानें एकाग्र अंतःकरणेंकरून चंद्रसूर्यांचे स्वर जाणावे.

शशांकंवारयेद्रात्रौदिवावारयभास्करं ॥ इत्य-
भ्यासरतोनित्यंसयोगीनात्रसंशयः ॥ ६६ ॥

अर्थ-रात्रीं चंद्रस्वर चालवूं नये, आणि सूर्यस्वर दिवसां निवारण करावा. अशा क्रमानें अभ्यासांत जो निमग्न असतो तोच योगी होय

सूर्येणबध्यतेसूर्यश्चंद्रश्चंद्रेणबध्यते ॥ योजा-
नातिक्रियामेतांत्रैलोक्यंवशगंक्षणात् ॥ ६७ ॥

अर्थ-सूर्यानें सूर्य बंद होतो आणि चंद्रानें चंद्र प्रतिबद्ध होतो. जर चंद्र बंद करावयाचा असेल तर डाव्या कुशीवर निजावें, किंवा डावे काखेंत कुबडी दाबून धरावी; याप्रमाणेंच सूर्य स्वर बंद करतांना उज-

वेकडे कुबडी धरावी, व उजवे कुशीवर निजावें. या क्रियेस जो जाणतो त्यास त्रैलोक्यही क्षणांत वश होतें.

उदयंचंद्रमार्गेणसूर्येणास्तमनंयदि ॥ तदातेगु-
णसंघाताविपरीतंविवर्जयेत् ॥ ६८ ॥

अर्थ–चंद्र तिथीस चंद्र मार्गानें उदय आणि सूर्य नाडीच्या मार्गानें अस्त जेव्हां होतो तेव्हां अनेक गुण उत्पन्न होतात, आणि जेव्हां याचे उलट होतें तेव्हां अनेक दोष होतात. याकरितां तें शुभकार्यास वर्ज होय.

गुरुशुक्रबुधें*दूनांवासरेवामनाडिका ॥ सिद्धि-
दासर्वकार्येषुशुक्लपक्षेविशेषतः ॥ ६९ ॥

अर्थ–गुरु, शुक्र, बुध आणि चंद्र या वारीं, त्यांत शुक्लपक्षीं विशेषेंकरून वामनाडी सर्व कृत्यांस सिद्धिदायक होय.

अर्कांगारकसौरीणांवासरेदक्षनाडिकाः ॥ स्म-
र्त्तव्याचरकार्येषुकृष्णपक्षेविशेषतः ॥ ७० ॥

अर्थ–रवि, मंगळ आणि शनि याच्यां वारीं दक्षिणनाडी चरकार्यास अत्युत्तम, त्यांत कृष्णपक्षीं विशेष फलदायक होय.

प्रथमंवहतेवायुःद्वितीयंचतथानलः ॥ तृतीयं
वहतेभूमिश्चतुर्थंवारुणीवहेत् ॥ ७१ ॥

अर्थ–पहिल्यानें वायुतत्त्व वाहतें, दुसऱ्यानें अग्नितत्त्व, तिसरें भूमितत्त्व, चौथें वारुणतत्त्व, पांचवें आकाश, मिळून पांच तत्त्वें दर २॥ घटिकेंत पृथक् पृथक् क्रमानें उदय पावतात.

सार्धद्विघटिकेपंचक्रमेणैवोदयंतिच ॥ क्रमादे-
कैकनाड्यांचतत्त्वानांपृथगुद्भवः ॥ ७२ ॥

---

* कोणी बुधवारीं सुषुम्नानाडी प्रशस्त असें ह्मणतात.

अर्थ-प्रत्येक अडीच घटिकांत पांच तत्त्वें उदय पावतात; याप्रमाणें इडा व पिंगला यांत पांच तत्त्वांचा उदय होतो.

**अहोरात्रस्यमध्येतुज्ञेयाद्वादशसंक्रमाः ॥ वृ-**
**षकर्कटकन्यालिमृगमीनानिशाकरे ॥ ७३ ॥**

अर्थ-दिवसाच्या व रात्रीच्या मिळून ६० घटिका, त्यांत चंद्र सूर्यांचीं बारा बारा संक्रमणें होतात, तीं बारा लग्नें होत. त्यांमध्यें वृषभ, कर्क, कन्या, वृश्चिक, मकर आणि मीन हीं लग्नें चंद्राचीं होत.

**मेषसिंहौचकुंभश्चतुलाचमिथुनंधनम् ॥ उदये**
**दक्षिणेज्ञेयःशुभाशुभविनिर्णयः ॥ ७४ ॥**

अर्थ-मेष, सिंह, कुंभ, तूळ, मिथुन आणि धन हीं सूर्यलग्नें जाणावीं. यांवरून शुभाशुभांचा निर्णय करावा.

**तिष्ठेत्पूर्वोत्तरेचंद्रोभानुःपश्चिमदक्षिणे ॥ दक्ष-**
**नाड्याःप्रसारेतुनगच्छेद्याम्यपश्चिमे ॥ ७५ ॥**

अर्थ-चंद्र हा पूर्व आणि उत्तर या दिशांचेठायीं राहतो, सूर्य पश्चिम व दक्षिण या ठिकाणीं राहतो. यासाठीं दक्षिणनाडींतून स्वर वाहत असतां दक्षिण व पश्चिम या दिशांस जाऊं नये.

**वामाचारप्रवाहेतुनगच्छेत्पूर्वउत्तरे ॥ परिपंथि-**
**भयंतस्यगतोऽसौनानिवर्त्तते ॥ ७६ ॥**

अर्थ-वामनाडीचा प्रवाह चालू असतां पूर्व व उत्तर या दिशांस जाऊं नये, जर कोणी जाईल तर त्यास शत्रूंचें भय उत्पन्न होईल, व तो गेलेला पुनः परत येणार नाहीं.

**तत्रतस्मान्नगंतव्यंबुधैःसर्वहितैषिभिः ॥ त-**
**दातत्रतुसंयातेमृत्युरेवनसंशयः ॥ ७७ ॥**

अर्थ-तस्मात् हिताची इच्छा करणारांनीं वर सांगितलेल्या निषिद्ध

दिशेस जाऊं नये. ज्या स्वरास जी निषिद्ध दिशा सांगितली आहे, त्या दिशेस जाणारास मृत्यु होतो असें समजावें.

शुक्लपक्षेद्वितीयायामर्केवहतिचंद्रमाः ॥ दृश्य-
तेलाभदःपुंसांसौम्येसौख्यंप्रजायते ॥ ७८ ॥

अर्थ-शुक्लपक्षीं द्वितीयेस सूर्य वाहत असून चंद्रदर्शन झालें असतां लाभदायक व सौम्य कर्यांत सुखप्रद होय.

सूर्योदयेयदासूर्यश्चंद्रश्चंद्रोदयेभवेत् ॥ सि-
ध्यंतिसर्वकार्याणिदिवारात्रिगतान्यपि ॥ ७९ ॥

अर्थ-ज्या दिवशीं सूर्य-स्वराचा उदय सांगितला आहे,त्या दिवशीं सूर्यस्वर आणि चंद्रोदयाच्या दिवशीं चंद्रस्वर वाहत असतां सर्व कार्यें सिद्ध होतात. मग तीं कार्यें दिवसाचीं असोत किंवा रात्रीचीं असोत.

चंद्रकालेयदासूर्यःसूर्यश्चंद्रोदयेभवेत् ॥ उद्वे-
गःकलहोहानिः शुभंसर्वंनिवारयेत् ॥ ८० ॥

अर्थ-चंद्रस्वराचे वेळीं सूर्यस्वर व सूर्यस्वराच्या वेळीं चंद्रस्वर चालू झाला असतां उद्वेग ( भय, ) कलह, हानि व शुभकृत्याचें निवारण हीं होतात.

सूर्यस्यवाहेप्रवदंतिविज्ञाज्ञानंह्यगम्यस्यतु
निश्चयेन ॥ श्वासेनयुक्तस्यतुशीतरश्मेः प्रवा-
हकालेफलमन्यथास्यात् ॥ ८१ ॥

अर्थ-सूर्यस्वराचा प्रवाह असतां अगम्य ( अतर्क्य ) अर्थाचेंही निश्चयानें ज्ञान होतें, आणि श्वासांत चंद्रस्वर असून त्याच्या प्रवाहांत अन्यथाफळ होतें ह्मणजे अगम्य अर्थाचें ज्ञान होणार नाहीं.

## अथविपरीतलक्षणम्.

यदाप्रत्यूषकालेनविपरीतोदयोभवेत् ॥ चंद्र-

स्थानेवहत्यर्कोरविस्थानेचचंद्रमाः ॥८२॥ प्रथ-
मेमनउद्वेगंधनहानिर्द्वितीयके ॥ तृतीयेगमनं
प्रोक्तंइष्टनाशंचतुर्थके ॥ ८३ ॥ पंचमेराजवि-
ध्वंसंषष्ठेसर्वार्थनाशनम् ॥ सप्तमेव्याधिदुःखा-
निअष्टमेमृत्युमादिशेत् ॥ ८४ ॥

अर्थ--प्रभातकालीं स्वरांचा उदय जर विपरीत होईल तर ( चंद्राच्या जागीं सूर्य व सूर्याचे जागीं चंद्र असे स्वर झाल्यास ) त्याचें ..ळुपरत्वें फल सांगतों.--पहिल्या दिवशीं विपरीत स्वर वाहत असल्यास मनांत उद्वेग होतो. दुसऱ्यांत धनहानि, तिसऱ्यांत गमन, चौथ्यांत इष्टनाश, पांचव्यांत राजविध्वंस, साहव्यांत सर्वार्थनाश, सातव्यांत व्याधिदुःखें ( रोग ) आणि आठव्यांत मृत्यु होतो असें जाणावें.

कालत्रयेदिनान्यष्टौविपरीतंयदावहेत् ॥ तदा
दुष्टफलंप्रोक्तंकिंचिन्न्यूनंतुशोभनम् ॥ ८५ ॥

अर्थ-प्रातर्मध्याह्न व सायंकाल या कालत्रयाचेठायीं सांगितलेले स्वर आठ दिवसांतही विपरीत वाहत असल्यास दुष्ट फल जाणावें. कांहीं न्यून असतां शुभफल जाणावें.

प्रातर्मध्याह्नयोश्चंद्रःसायंकालेदिवाकरः ॥
तदानित्यंजयोलाभोविपरीतंविवर्जयेत् ॥ ८६ ॥

अर्थ-प्रातःकालीं व मध्याह्नकालीं चंद्र व सायंकालीं सूर्य असेल तेव्हां जय व लाभ होतात. विपरीत झाले तर अशुभ जाणावें.

वामेवादक्षिणेवापियत्रसंक्रमतेशिवः ॥ कृत्वा
तत्पादमादौचयात्राभवतिसिद्धिदा ॥ ८७ ॥

अर्थ-वामभागीं किंवा दक्षिणभागीं जिकडे स्वर वाहत असेल तो पाय प्रथम पुढें करून प्रयाण केलें असतां सिद्धिदायक होतें.

चंद्रः समपदः कार्यो रविस्तु विषमः सदा ॥ पूर्ण-
पादं पुरस्कृत्य यात्रा भवति सिद्धिदा ॥ ८८ ॥

अर्थ-चंद्रस्वर चालू असतां प्रथम समपाउलें २, ४, ६ अशीं, आणि सूर्यस्वर चालू असता विषम ह्मणजे ३, ५, ७ अशीं पाउलें टाकावीं; पूर्णपाद पुढें करून प्रयाण करावें ह्मणजे सिद्धि होते.

यत्रांगे वहते वायुस्तदंगकरसत्तलात् ॥ सुप्तो-
त्थितो मुखं स्पृष्ट्वा लभते वांछितं फलम् ॥ ८९ ॥

अर्थ-ज्या भागीं वायु वाहतो त्या आंगच्या तळहातानें निजून उठतांच मुखास स्पर्श करावा ह्मणजे इच्छित फल प्राप्त होतें.

परदत्ते तथा ग्राह्ये गृहान्निर्गमनेऽपि च ॥ यदंगे
वहते नाडी ग्राह्यं तेन करांघ्रिणा ॥ ९० ॥

अर्थ-दुसऱ्यास कांहीं देतांना किंवा दुसऱ्यापासून घेतांना आणि घरांतून बाहेर जातांना जी नाडी वाहत असेल त्या आंगचे हात पाय प्रथम पुढें करावे, आणि तें काम करावें ह्मणजे तें कार्य उत्तम होतें.

न हानिः कलहो नैव कंटकैर्नापि भिद्यते ॥ निवर्त्त-
ते सुखी चैव सर्वोपद्रववर्जितः ॥ ९१ ॥

अर्थ-त्या कृत्यांत कांहीं हानि व कलह होत नाहीं. शत्रूंकडून त्याचा नाश होत नाहीं, आणि निरुपद्रवीपणानें घरास सुखेंकरून परत येतो.

गुरुबंधुनृपामात्येष्वन्येषु शुभदायिनी ॥ पूर्णां-
गे खलु कर्त्तव्या कार्यसिद्धिर्मनःस्थिता ॥ ९२ ॥

अर्थ-गुरु, बंधु, राजा, प्रधान, इत्यादिकांपासून कार्य कर्त्तव्य असतां पूर्णांगानें त्या कृत्यास आरंभ करावा, ह्मणजे मनाप्रमाणें कार्यसिद्धि होते.

अग्निचोराधर्मधर्मोअन्येषांवादिनिग्रहाः ॥ क-
र्त्तव्याःखलुरिक्तायांजयलाभसुखार्थिभिः ॥ ९३ ॥

अर्थ-अग्निदाह, चोरास देणें, अधर्मकृत्य आणि वादिनिग्रह हीं कार्यें रिक्तनाडीवर करावीं. ह्मणजे कर्त्यास जय, लाभ, व सुख हीं प्राप्त होतात.

दूरदेशेविधातव्यंगमनंतुहिमद्युतौ ॥ अभ्यर्ण-
देशेदीप्तेतुतरणावितिकेचन ॥ ९४ ॥

अर्थ-कित्येक लोकांचें मत असें आहे कीं, दूरदेशीं गमन कर्त्तव्य असतां चंद्र स्वरावर जावें आणि समीप देशांत जावयाचें असल्यास सूर्य स्वरावर गमन करावें.

यत्किंचित्पूर्वमुद्दिष्टंलाभादिसमरागमः ॥ तत्स-
र्वेपूर्णनाडीषुजायतेनिर्विकल्पकम् ॥ ९५ ॥ शू-
न्यनाड्याविपर्यस्तंयत्पूर्वंप्रतिपादितं ॥ जायते-
नान्यथाचैवयथासर्वज्ञभाषितम् ॥ ९६ ॥

अर्थ-जें पूर्वीं सांगितलें तें व लाभाचें कृत्य आणि युद्ध हीं कृत्यें पूर्णस्वरावर करावीं, ह्मणजे परिपूर्ण होतात, आणि हीं कृत्यें शून्य नाडीवर केलीं असतां पूर्ण होत नाहींत; असें सर्वज्ञ जो शंकर त्याचें वचन आहे.

व्यवहारेखलोच्चाटेद्वेषिविद्यादिवंचके ॥ कुपि-
तस्वामिचोराद्येपूर्णस्थाः स्युर्भयंकराः ॥ ९७ ॥

अर्थ-व्यापार, खलांचें उच्चाटन, द्वेष करणारे लोकांची वंचना, रागावलेल्या स्वामीचें दर्शन, चोरांची गांठ, या प्रसंगीं पूर्ण नाड्या भयंकर होत. याकरितां आपली रिक्तनाडी वर लिहिलेल्यांकडे करून उभें राहावें.

दूराध्वनिशुभश्चंद्रोनिर्विघ्नोऽभीष्टसिद्धिदः ॥ प्रवेश-
कार्यहेतौचसूर्यनाडीप्रशस्यते ॥ ९८ ॥

अर्थ-दूरमार्गास जातांना चंद्रस्वर निर्विघ्नतेनें इष्टसिद्धि करणारा होय. आणि प्रवेश कार्यास सूर्यनाडी प्रशस्त होय.

अयोग्येयोग्यतानाड्यायोग्यस्थानेऽप्ययोग्यता ॥
कार्यानुबंधनोजीवोयथारुद्रस्तथाचरेत् ॥ ९९ ॥

अर्थ-नाडीच्या योगानें अयोग्यास योग्यता प्राप्त होते, आणि योग्य प्राणी अयोग्यतेस प्राप्त होतो; याकरितां जीवानें आपल्या कार्यास योग्य अशा नाडीचा उपयोग करावा, व जसा वायु असेल तसें वागावें.

चंद्रचारेविषहतेसूर्योबलिवशंनयेत् ॥ सुषुम्नायांभ-
वेन्मोक्षएकोदेवस्त्रिधास्थितः ॥ १०० ॥

अर्थ-चंद्रस्वर चालू असतां इतरांनीं केलेले अपकार सहन करतो, सूर्यस्वरांत बलवानासही वश करतो. सुषुम्नानाडी चालू असतां मोक्ष होतो. याप्रमाणें एक देव तीन प्रकारांनीं राहिला आहे.

शुभान्यशुभकार्याणिक्रियंतेऽहर्निशंयदा ॥ तदाका-
र्यानुरोधेनकार्यंनाडीप्रचालनम् ॥ १०१ ॥

अर्थ-शुभ किंवा अशुभ कार्यें रात्रीं व दिवसां जीं कर्त्तव्य असतील त्या कार्यानुरूप नाडीचें चलन करावें.

## अथ इडा.

स्थिरकर्मण्यलंकारेदूराध्वगमनेतथा ॥ आश्रमेध-
र्मप्रासादेवस्तूनांसंग्रहेऽपिच ॥ १०२ ॥

अर्थ-स्थिरकर्म, अलंकार, दूरदेशगमन, आश्रम धर्म, गृह व वस्तुसंग्रह या कृत्यांस इडा ह्मणजे चंद्रनाडी प्रशस्त होय.

वापीकूपतडागादिप्रतिष्ठास्तंभदेवयोः ॥ यात्रादा-
नेविवाहेचवस्त्रालंकारभूषणे ॥ १०३ ॥

अर्थ-विहीर, आड, व तळीं बांधणें, स्तंभ व देव यांची प्रतिष्ठा, यात्रा, दान व लग्न वस्त्र आणि अलंकार-धारण, या कृत्यांस चंद्र (वाम) नाडी प्रशस्त होय.

शांतिकेपौष्टिकेचैव दिव्यौषधिरसायने ॥ स्वस्वा-
मिदर्शनेमित्रेवाणिज्येकणसंग्रहे ॥ १०४ ॥

अर्थ-शांतिकर्म, पौष्टिक, दिव्य औषधि, रसायनें, स्वकीयजन व स्वामी यांचें दर्शन, मित्रसंग्रह, व्यापार व धान्यसंग्रह हीं कृत्यें इडा-नाडी (चंद्र) चालू असतां शुभ होत.

गृहप्रवेशेसेवायांकृषौचबीजपावने ॥ शुभकर्मणि
संधौचनिर्गमेचशुभः शशी ॥ १०५ ॥

अर्थ-गृहप्रवेश, सेवा, कृषी, बीज पेरणें, संधि ( तह करणें ), निर्गम आणि इतर शुभ कर्मे यांस चंद्रनाडी शुभ होय.

विद्यारंभादिकार्येषुबांधवानांचदर्शने ॥ जन्ममोक्षे
चधर्मेचदीक्षायांमंत्रसाधने ॥ १०६ ॥ कालविज्ञा-
नसूत्रेतुचतुष्पादगृहागमे ॥ कालव्याधिचिकित्सा-
यांस्वामिसंबोधनेतथा ॥ १०७ ॥

अर्थ-विद्यारंभ, बंधुदर्शन, जन्म, ( उपनयन ) मोक्ष, धर्म, दीक्षा, मंत्रसिद्धि, कालविज्ञान, व सूत्र यांचें अध्ययन, चतुष्पाद घरास आणणें, काल व व्याधीची चिकित्सा करणें, व स्वामीस बोलावणें, या कृत्यास चंद्रनाडी शुभ होय.

गजाश्वारोहणेधन्विगजाश्वानांचबंधने ॥ परोपका-
रणेचैवनिधीनांस्थापनेतथा ॥ १०८ ॥ गीतवाद्य-

दिनृत्यादौनृत्यशास्त्रविचारणे ॥ पुरग्रामनिवेशेचति-
लकक्षेत्रधारणे ॥ १०९ ॥

अर्थ-नूतन हत्ती व घोडा यांवर आरोहण, गजाश्वांचें बंधन, परोपकार, निधिस्थापन, गायन, वाद्य व नृत्य यांस आरंभ, गीत, शास्त्रविचार, शहर किंवा ग्राम यांत प्रवेश, तिलकधारण, आणि क्षेत्र ( शेत ) ग्रहण या कृत्यांस चंद्र ( इडा ) नाडी शुभ होय.

आर्तिशोकविषादेचज्वरितेमूर्च्छितेऽपिवा ॥ स्वज-
नस्वामिसंबंधेअन्नादेर्दारुसंग्रहे ॥ ११० ॥

अर्थ-दुःख,* शोक, विषाद, ज्वर, मूर्छा, स्वजन व स्वामी यांचा संबंध, आणि अन्नादिक व काष्ठें यांचा संग्रह, या कृत्यांस चंद्रनाडी प्रशस्त होय.

स्त्रीणांदंतादिभूषायांवृष्टेरागमनंतथा ॥ गुरुपूजावि-
षादीनांचालनेचवरानने ॥ १११ ॥ इडायांसिद्धिदं
प्रोक्तंयोगाभ्यासादिकर्मच ॥ तत्रापिवर्जयेद्वायुंतेज
आकाशमेवच ॥ ११२ ॥

अर्थ-स्त्रियांचीं दंतादि भूषणें ( बांगड्या फणी वगैरे ) वृष्टीचा आरंभ, गुरुपूजा, विषादिकांचें चालन ( बाहेर पाडणें ) आणि योगाभ्यासादि कर्मे हीं सर्व कृत्यें इडा ( वाम ) नाडीवर केलीं असतां, सिद्धिस जातात; परंतु त्या नाडींत वायु, तेज, आणि आकाश हीं तत्त्वें वर्ज होत.

सर्वकार्याणिसिद्ध्यंतिदिवारात्रिगतान्यापि ॥
सर्वेषुशुभकार्येषुचंद्रचारःप्रशस्यते ॥ ११३ ॥

अर्थ हीं वर सांगितलेलीं कृत्यें दिवसा किंवा रात्रीं केलीं तरी सि-

* दुःख शोकादिक चंद्रनाडीवर प्राप्त झाले असतां लवकर नाहींसे होतात.

द्ध होतात. एवंच सर्व शुभ कृत्यांत चंद्रनाडी प्रशस्त होय.

### अथ पिंगला.

कठिनक्रूरविद्यानांपठनेपाठनेतथा ॥ स्त्रीसंगवेश्यागमनेमहानौकाधिरोहणे ॥११४॥ भ्रष्टकार्येसुरापानेवीरमंत्राद्युपासने ॥ विव्हलोत्ध्वंसदेशादौविषदानेचवैरिणां ॥११५॥ शास्त्राभ्यासेचगमनेमृगयापशुविक्रये ॥ इष्टकाकाष्ठपाषाणरत्नघर्षणदारुणे ॥ ११६ ॥

अर्थ-कठिन व क्रूर अशा विद्यांचें पठन किंवा अध्यापन, स्त्रीसंग, वेश्यागमन, महानौकेंत आरोहण, दुष्टकृत्य, सुरापान, वीरमंत्रादिकांची उपासना, विव्हलता, देशविध्वंस, वैऱ्यास विष देणें, शास्त्राभ्यास, गमन, मृगया, जनावरांचें युद्ध, इष्टिका ( विटा ), पाषाण, काष्ठ,रत्न, यांचें घर्षण आणि इतर दारुण कृत्यें यांस पिंगला ( सूर्य ) नाडी प्रशस्त होय.

गत्यभ्यासेयंत्रतंत्रेदुर्गपर्वतरोहणे ॥ द्यूतेचौर्येगजाश्वादिरथसाधनवाहने ॥११७॥ व्यायामेमारणोच्चाटेषट्कर्मादिकसाधने ॥ यक्षिणीयक्षवेतालविषभूतादिनिग्रहे ॥११८॥ खरोष्ट्रमाहिषादीनां गजाश्वारोहणेतथा ॥ नदीजलौघतरणेभेषजेलिपिलेखने ॥ ११९ ॥

अर्थ-द्यूतक्रीडा, अश्व, गज, रथ इत्यादि वाहनांची सिद्धता अथवा त्यांवर आरोहण करणें, चौर्यगतीचा अभ्यास, यंत्र, तंत्र, किल्ला, व पर्वत, यांवर चढणें, व्यायाम, मारण, उच्चाटन, षट्कर्मे, यक्षिणी, यक्ष, वेताल, विष आणि पिशाच, यांचें निवारण, गर्दभ, उंट, महिष, गज,

व अश्व इत्यादिकांवर आरोहण, नदीच्या उदकांतून पार जाणें, तीव्र औषधें व लिपींचें लेखन या सर्व कृत्यांस दक्षिणनाडी प्रशस्त होय.

मारणेमोहनेस्तंभेविद्वेषोच्चाटनेवशे ॥ प्रेरणेकर्षणेक्षोभेदानेचक्रयविक्रये ॥ १२० ॥ प्रेताकर्षणविद्वेषशत्रुनिग्रहहणेऽपिच ॥ खड्गहस्तेवैरियुद्धेभोगेवाराजदर्शने ॥ भोज्येस्नानेव्यवहारेदीप्तकार्येरविःशुभः ॥ १२१ ॥

अर्थ-मारण, मोहन, स्तंभन, द्वेष, उच्चाटन, वशीकरण, प्रेरण, आकर्षण, क्षोभ, दान, क्रय, विक्रय, प्रेताचें हरण, शत्रुनिग्रह, वैऱ्याशीं युद्ध, भोग, राजदर्शन, भोजन व स्नान या कृत्यांस पिंगला नाडी प्रशस्त होय.

भुक्तमार्गेणमंदाग्नौस्त्रीणांवश्यादिकर्माणि ॥ शयनंसूर्यवाहेनकर्तव्यंसर्वदाबुधैः ॥१२२॥ क्रूराणिसर्वकर्माणिचराणिविविधानिच ॥ तानिसिद्ध्यंतिसूर्येणनात्रकार्याविचारणा ॥ १२३ ॥

अर्थ-भोजनानें अग्नि मंद करणें, स्त्रियांचें वशीकरण, व शयन हें सर्व सूर्यस्वरावर करावें. सारांश क्रूर व चर अशीं सर्व कर्मे सूर्यस्वरावर केलीं असतां सिद्ध होतात, यांत संशय नाहीं.

## अथ सुषुम्ना.

क्षणंवामेक्षणंदक्षेयदावहतिमारुतः ॥ सुषुम्ना साचविज्ञेयासर्वकार्यहरास्मृता ॥ १२४ ॥

अर्थ-वायु, ( स्वर ) क्षणभर डावेकडे व क्षणांत उजवेकडे जेव्हां वाहतो, तेव्हां सुषुम्ना नाडीचा प्रचार आहे असें जाणावें. ही सुषुम्ना नाडी सर्व कार्यांचा नाश करणारी होय.

तस्यांनाड्यांस्थितोवन्हिर्ज्वलतेकालरूपकः ॥
विषवत्तंविजानीयात्सर्वकार्यविनाशनम् ॥ १२५ ॥

अर्थ-त्या सुषुम्ना नाडीचे ठिकाणीं कालरूपी अग्नि नेहमीं प्रज्वलित आहे, तो विषाप्रमाणें कार्यारंभास वर्ज्य होय; कारण, त्यावर केलेल्या सर्व कार्यांचा नाश होतो.

यदानुक्रममुल्लंघ्ययस्यनाडीद्वयंवहेत् ॥ तदातस्य
विजानीयादशुभंनात्रसंशयः ॥ १२६ ॥ क्षणंवामे
क्षणंदक्षेविषमंभावमादिशेत् ॥ विपरीतंफलंज्ञेयं
ज्ञातव्यंचवरानने ॥ १२७ ॥

अर्थ-जेव्हां क्रम उल्लंघन करून पुरुषाच्या दोन्ही नाड्या वहात असतात, तेव्हां त्या मनुष्यास अशुभ फल आहे असें जाणावें. आता ज्याची नाडी क्षणांत डावीकडे आणि क्षणांत उजवीकडे वाहते त्याासही विषमभाव (संकट ) आला असें जाणावें. त्यास विपरीत फल प्राप्त होतें.

उभयोरेवसंचारंविषवंतंविदुर्बुधाः ॥ नकुर्यां-
त्क्रूरसौम्यानितत्सर्वंविफलंभवेत् ॥ १२८ ॥

अर्थ-जेव्हां दोन्ही नाडींचा संचार चालू असतो तेव्हां त्यास विषयुक्त असें ज्ञानी ह्मणतात. यासाठीं त्या उभयात्मक (सुषुम्ना) स्वरावर क्रूर व सौम्य दोन प्रकारचींही कृत्यें करूं नयेत. कारण, तीं निष्फळ होतात.

जीवितेमरणेप्रश्नेलाभालाभेजयाजये ॥ विषमेवि-
परीतेचसंस्मरेज्जगदीश्वरं ॥ १२९ ॥ ईश्वरेचिं-
तितेकार्यंयोगाभ्यासादिकर्मच ॥ अन्यत्तत्रनक-
र्तव्यंजयलाभसुखैषिभिः ॥ १३० ॥

अर्थ-जीवित, मरण, प्रश्न, लाभ, अलाभ, जय व पराजय या गोष्टी, विषम आणि विपरीत स्वर इत्यादि प्रसंगीं करूं नयेत. एक जगदीश्वराचें स्मरण करावें. ॥ १२९ ॥ ईश्वराचें चिंतन करून नंतर योगाभ्यास आदिकरून पारमार्थिक कृत्य करावें. जय, लाभ व सुख यांची इच्छा करणारे लोकांनीं परमार्थाशिवाय दुसरें कर्म करूं नये.

सूर्येणवहमानायांसुषुम्नायांमुहुर्मुहुः ॥
शापंदद्याद्वरंदद्यात्सर्वथैवतदन्यथा ॥ १३१ ॥

अर्थ-सूर्यस्वरांत सुषुम्ना नाडी वारंवार वाहत असतां शाप किंवा वर दिला तर सर्व निरर्थक होतो.

नाडीसंक्रमणेकालेतत्त्वसंगमनेपिच ॥ शुभं
किंचिन्नकर्त्तव्यंपुण्यदानानिकोटिधा ॥ १३२ ॥

अर्थ-नाडीचें संक्रमण होण्याचे वेळेस व तत्त्वांचें संक्रमण ( चलन ) होतांना दान आदिकरून पुण्यकर्में करावीं. दुसरें शुभकर्म करूं नये.

विषमस्योदयोयत्रमनसाऽपिनाचिंतयेत् ॥
यात्राहानिकरीतस्यमृत्युःक्लेशोनसंशयः ॥ १३३ ॥

अर्थ-ज्यावेळेस विषमस्वराचा उदय असतो, तेव्हां कोणतेंही कार्य मनांत आणूं नये. विषम स्वरावर जो प्रयाण करतो त्यास मृत्यु प्राप्त होतो आणि अनेक क्लेश प्राप्त होतात, यांत संशय नाहीं.

पुरोवामोर्ध्वतश्चंद्रोदक्षाधःपृष्ठतोरविः ॥ पूर्णरि-
क्तविवेकोयंज्ञातव्योदैशिकैःसदा ॥ १३४ ॥

अर्थ-पुढें, डावीकडे आणि ऊर्ध्वचंद्र बली होय, व दक्षिणेकडे, खालीं आणि पृष्ठभागीं सूर्य बली होय. यावरून विद्वान् लोकांनीं पूर्ण रिक्त या स्थानाचा विचार करावा.

ऊर्ध्ववामाग्रतोदूतोज्ञेयोवामपथिस्थितः॥ पृष्ठेदक्षे तथाऽधस्तात्सूर्यवाहागतःशुभः ॥ १३५ ॥

अर्थ-वाम ( चंद्र ) स्वर वाहत असतां आलेला दूत ऊर्ध्वभागीं, ामभागीं आणि अधोभागीं आल्यास शुभ जाणावा. तसेंच सूर्यस्वर ालत असतां पृष्ठभागीं व दक्षिणभागीं आणि खालीं आलेला दूत भसूचक होय.

अनादिर्विषमःसंधिर्निराहारोनिराकुलः॥ परेसूक्ष्मेविलीयेतसासंध्यासद्भिरुच्यते ॥ १३६ ॥ नवेदंवेदइत्याहुर्वेदोवेदोनविद्यते ॥ परात्मावेद्यतेयेनसवेदोवेदउच्यते ॥ १३७ ॥ नसंध्यासंधिरित्याहुःसंध्यासंधिर्निगद्यते ॥ विषमःसंधिगः प्राणःससंधिस्संधिरुच्यते ॥ १३८ ॥

॥ इति नाडीभेदः ॥

अर्थ-अनादि, निष्क्रिय, निश्चल असा जो विषमसंधि ( सुषुम्ना ) ो परतत्त्व जें ब्रह्म त्याचे ठिकाणीं लीन होतो, त्यास संध्या असें सा- ्र ह्मणतात. १३६. प्रसिद्ध वेदास वेद ह्मणत नाहींत. कारण, त्याचे ठिकाणीं वेदत्व नाहीं; ज्याच्या योगानें परमात्मा जाणला जातो, त्या- ाच साधु वेद ह्मणतात. १३७. तसेंच ब्राह्मण दिवसरात्री यांचे संधी- ा संध्या करतात त्या संध्येस साधु संधि असें ह्मणत नाहींत, तर वि- ामसंधिगत ( सुषुम्ना नाडींत ) असणारा प्राणच संधि होय. १३८.

श्रीदेव्युवाच ॥ देवदेवमहादेवसर्वसंसारतारक ॥ स्थितंत्वदीयहृदयेरहस्यंवदमेप्रभो ॥ १३९ ॥

अर्थ-पार्वती ह्मणते, हे देवाधिदेवा शंकरा, तूं या संसारसमुद्रांतून ारणारा आहेस, ह्मणून मी विचारतें; आपले हृदयांत असलेलें रहस्य मला सांगावें.

ईश्वरउवाच॥स्वरज्ञानरहस्यात्तुनकाचिच्चेष्टदेवता॥
स्वरज्ञानरतोयोगीसयोगीपरमोमतः ॥ १४० ॥

अर्थ-शंकर ह्मणतात; हे पार्वती, अत्यंत गोप्य जें स्वरज्ञान याशिवाय दुसरें रहस्य नाहीं, हेंच आमचें इष्ट दैवत होय. स्वरज्ञानीं रममाण जो योगी तोच श्रेष्ठ योगी होय.

पंचतत्त्वाद्भवेत्सृष्टिस्तत्त्वेतत्त्वंप्रलीयते ॥ पंचतत्त्वंपरंतत्त्वंतत्त्वातीतंनिरंजनं ॥१४१ ॥

अर्थ-पंचतत्त्वांपासून सृष्टि उत्पन्न होते, आणि लयही तत्त्वांतच होतो; याकरितां पंचतत्त्वें हेंच मुख्य तत्त्व होय. निर्गुण जो परमात्मा तो या पाच तत्त्वापासून अगदीं निराळा आहे.

तत्त्वानांनामविज्ञेयंसिद्धियोगेनयोगिनां ॥ भूतानांदुष्टचिन्हानिजानातीहस्वरोत्तमः ॥ १४२ ॥

अर्थ-योगिजनांनीं सिद्धियोगानें ( अभ्यासयोगानें ) स्वरांतील तत्त्वांचें नांव जाणावें. तत्त्वें व स्वर यांचें ज्यास पूर्ण ज्ञान आहे तो योगी भूतमात्राचीं दुष्ट चिन्हें सहज जाणतो.

पृथिव्यापस्तथातेजोवायुराकाशमेवच ॥ पंचभूतात्मकंविश्वंयोजानातिसपूजितः ॥ १४३ ॥

अर्थ-पृथ्वी, पाणी, तेज, वायु आणि आकाश हीं जीं भूतें तींच पंचतत्त्वें होत. पंचभूतात्मकच हें सर्व जग आहे. या पाच तत्त्वांस जो जाणतो तोच पूज्य होतो.

सर्वलोकस्थजीवानांनदेहोभिन्नतत्त्वकः ॥ भूलोकात्सत्यपर्यंतंनाडीभेदःपृथक्पृथक् ॥ १४४ ॥

अर्थ-भूलोकापासून सत्यलोकापर्यंत सर्व लोकातील जीवाचे देहात तत्त्वें भिन्न भिन्न नाहींत. सर्वांत पंचतत्त्वें (पंचभूतें) सारखींच आहेत.

रंतु शरीरांतील नाड्या मात्र भिन्न भिन्न आहेत.

**वामेवादक्षिणेवाऽपिउदयाःपंचकीर्त्तिताः ॥ अष्ट- धातत्त्वविज्ञानंशृणुवक्ष्यामिसुंदरि ॥ १४५ ॥**

अर्थ-वाम व दक्षिणभागीं उदय पांच तत्त्वांचे पांच आहेत. हे ुंदरि, त्या तत्त्वांचें ज्ञान आठ प्रकारांनीं तुला सांगतों.

**प्रथमेतत्त्वसंख्यानंद्वितीयेश्वाससंधयः ॥ तृती- येस्वरचिन्हानिचतुर्थेस्थानमेवच ॥ १४६ ॥ पं- चमेतस्यवर्णाश्चषष्ठेतुप्राणएवच ॥ सप्तमेस्वाद- संयुक्ताअष्टमेगतिलक्षणम् ॥ १४७ ॥ एवमष्ट- विधंप्राणंविषुवंतंचराचरम् ॥ स्वरात्परतरंदेवि नान्यथात्वंबुजेक्षणे ॥ १४८ ॥**

अर्थ-प्रथम प्रकारांत तत्त्वांची संख्या, दुसऱ्यांत श्वासांच्या संधि, तेसऱ्यांत स्वरचिन्हें, चौथ्यांत स्थान, पांचव्यांत तत्त्वाचे रंग, साह- यांत प्राण, सातव्यांत स्वाद, आणि आठव्या प्रकारात गतीचें लक्षण; ाप्रमाणें आठ प्रकारांनीं चराचरांत व्यापून राहतो त्या प्राणाचें ज्ञान ोतें. हे पार्वती, या जगांत स्वरतत्त्वज्ञान मुख्य होय, त्यावांचून इतर ान श्रेष्ठ नाहीं.

**निरीक्षितव्यंयत्नेनसदाप्रत्यूषकालतः ॥ काल- स्यवंचनार्थायकर्मकुर्वंतियोगिनः ॥ १४९ ॥**

अर्थ-प्रभातकालापासून योग्यानें स्वर व त्यांतील तत्त्वांचे उदय ोठ्या दक्षतेनें अवलोकन करावे. कोणतेंही कर्म करीत असतां स्वरो- याचें अनुसंधान करावें; कारण, जे स्वरज्ञानी योगी आहेत ते केवळ ालक्षेप करावयासाठीं कर्मे करतात, परंतु त्यांचें लक्ष तत्त्व व स्वर ांकडेच असतें.

**श्रुत्योरंगुष्ठकौमध्यांगुल्यौनासापुटद्वये ॥ वदन-**

प्रांतकेचान्यांगुलीर्दद्याच्चनेत्रयोः ॥ १५० ॥

अर्थ-तत्त्वज्ञान होण्यासाठीं षण्मुखी मुद्रा करावी, ती अशी–दोन्ही कानांत दोन आंगठे द्यावे, नाकपुड्यावर दोन्ही मध्यमा ठेवाव्या, नेत्रांचे ठिकाणीं व मुखप्रांतावर अन्य अंगुली ठेवाव्या, ह्मणजे नेत्रावर तर्जनी ठेवून राहिलेल्या बोटांनीं मुखाचे प्रांत झांकावे. अशा रीतीनें सहा छिद्रें रोधावीं; यास षण्मुखी मुद्रा योगी ह्मणतात.

अस्यांतस्तुपृथिव्यादि-तत्त्वज्ञानंभवेत्क्रमात् ॥
पीतश्वेतारुणश्यामै-बिंदुभिर्निरुपाधिकम् ॥१५१॥

अर्थ-याच्या आंत पृथ्वी आप आदिकरून तत्त्वांचें क्रमानें ज्ञान होतें. तें असें कीं, वरील षण्मुखी मुद्रा केली असतां पांच रंग दिसतात ते. १ ला पिंवळा, २ रा पांढरा, ३ रा तांबडा, ४ निळा, आणि पांचवा चित्रविचित्र, असे पांच. त्यांत क्रमानें पृथ्वीचा पीतवर्ण, आप [ पाण्याचा ] श्वेतवर्ण, तेजाचा तांबडा, वायूचा निळा आणि आकाशाचा चित्रवर्ण होय असें जाणावें.

दर्पणेनसमालोक्यतत्रश्वासंविनिक्षिपेत् ॥ आकारैस्तुविजानीयात्तत्त्वभेदंविचक्षणः ॥ १५२ ॥

अर्थ-श्वास रोधून कांशाच्या आरशावर सोडावा, आणि त्यावर ज्या आकृती दिसतील त्यांवरून विचक्षण मनुष्यानें तत्त्वांचा भेद जाणावा.

चतुरस्त्रंचार्धचंद्रंत्रिकोणंवर्तुलंस्मृतं ॥ बिंदुभिस्तुनभोज्ञेयमाकारैस्तत्त्वलक्षणम् ॥ १५३ ॥

अर्थ–चतुष्कोण, अर्धचंद्र, त्रिकोण, वर्तुल आणि अनेक बिंदु या आकारांवरून क्रमानें पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश हीं तत्त्वें उदय पावलीं आहेत असें जाणावें.

मध्येपृथ्वीह्यधश्चापश्चोर्ध्वंवहतिचानलः ॥

तिर्यग्वायुप्रवाहश्चनभोवहतिसंक्रमे ॥ १५४ ॥

अर्थ-श्वास वाहतांना नाकपुडीच्या खालीं वर कोठें न लागून मध्येंच वाहत असेल तर पृथ्वी तत्त्व, खालच्या भागास झगटून राहील तर उदक, वरच्या भागास स्पर्श करील तर अग्नि, वांकडा वाहत असल्यास वायु आणि दोन्ही स्वर बाहेर न येतां आंत वाहत असल्यास आकाशतत्त्व समजावें.

आपःश्वेताःक्षितिःपीतारक्तवर्णोहुताशनः ॥
मारुतोनीलजीमूतआकाशःसर्ववर्णकः ॥ १५५ ॥

अर्थ-उदक शुभ्रवर्ण, पृथ्वी पीत, अग्नि रक्तवर्ण, वायु निळा आणि आकाश चित्रवर्ण होय असें जाणावें.

## आतां स्थानपरत्वें तत्त्वज्ञान.

स्कंधद्वयेस्थितोवन्हिर्नाभिमूलेप्रभंजनः ॥ जानुदेशेक्षितिस्तोयंपादांतेमस्तकेनभः ॥ १५६ ॥

अर्थ-अग्नि हा दोन्ही स्कंधांचे ठिकाणीं स्थित आहे, वायु नाभिमूळाचेठायीं, पृथ्वी गुडघ्यांचे ठिकाणीं, उदक पायांच्या शेवटीं आणि आकाश हें मस्तकाचें ठिकाणीं राहतें.

## आतां स्वादांवरून तत्त्वज्ञानप्रकार.

माहेयंमधुरंस्वादेकषायंजलमेवच ॥ तीक्ष्णंतेजः
समीरोऽम्लआकाशंकटुकंतथा ॥ १५७ ॥

अर्थ-पृथ्वी हें तत्त्व स्वादानें मधुर आहे, पाणी कषाय (तुरट) आहे, तेज तीक्ष्ण, वायु अम्ल [आंबट] आणि आकाश हें कटु आहे.

## आतां गतीवरून तत्त्वांचें ज्ञान.

अष्टांगुलंवहेद्वायुरनलश्चतुरंगुलम् ॥ द्वादशांगुलिमाहेयंवारुणंषोडशांगुलम् ॥ १५८ ॥

अर्थ–श्वास वाहतांना किती अंगुलें वाहतो हें पाहून त्यावरून तत्त्व जाणावें. वायु ८ अंगुलें, अग्नि चार अंगुलें, पृथ्वी बारा अंगुलें आणि आप तत्त्व सोळा अंगुलें वाहतें. आकाश हें तेथल्या तेथेंच मोकळें वाहतें.

ऊर्ध्वेमृत्युरधःशांतिस्तिर्यगुच्चाटनंतथा ॥ मध्येस्तंभंविजानीयान्नभःसर्वत्रमध्यमम् ॥ १५९ ॥

अर्थ–अग्नि हा ऊर्ध्व वाहतो तो मृत्युकारक होय, ह्मणून या तत्त्वांत मारणादिक करावें. आप तत्त्व खालीं वाहतें, तें शांतिकर्मास युक्त होय. वायुतत्त्व वांकडें चालतें, यावर उच्चाटन करावें. पृथ्वी हें तत्त्व मध्यें वाहतें, तें स्तंभनास युक्त होय, आणि आकाश हें सर्व भागास व्यापून राहतें ह्मणून आकाश मध्यस्थ जाणावें. यांवर कांहींएक करूं नये.

पृथिव्यांस्थिरकर्माणिचरकर्माणिवारुणे ॥ तेजसिक्रूरकर्माणिमारणोच्चाटनेऽनिले ॥ १६० ॥

अर्थ–पृथ्वीतत्त्वावर स्थिर कर्में, आपतत्त्वावर चर कर्में, तेजावर क्रूर कर्में, आणि वायूवर मारण उच्चाटन इत्यादि कर्में करावीं, ह्मणजे सिद्ध होतात.

व्योम्निकिंचिन्नकर्त्तव्यमभ्यसेद्योगसेवनम् ॥ शून्यतासर्वकार्येषुनात्रकार्याविचारणा ॥ १६१ ॥

अर्थ–आकाश तत्त्व चालत असतां कांहींएक करूं नये. एक योगाभ्यास मात्र करावा. कारण, आकाश तत्त्वावर दुसरें कोणतेंही कार्य केलें असतां त्यांत नाश होतो.

पृथ्वीजलाभ्यांसिद्धिःस्यान्मृत्युर्वह्नौक्षयोनिले ॥ नभसोनिष्फलंसर्वंज्ञातव्यंतत्त्ववेदिभिः ॥ १६२ ॥

अर्थ–पृथ्वी आणि जल हीं तत्त्वें सिद्धिप्रद होत. अग्नि हा मृत्यु-

कारक व वायु हा क्षय करणारा होय. आणि आकाश तत्त्वावर को-णतेंही कृत्य केलें असतां निष्फल होतें.

चिरलाभःक्षितेर्ज्ञेयस्तत्क्षणेतोयतत्त्वतः ॥ हा-
निःस्याद्वन्हिवाताभ्यांनभसोनिष्फलंभवेत्॥१६३॥

अर्थ–पृथ्वी तत्त्व चिरकालानें लाभ देणारें आणि उदक तत्क्षणीं लाभ देणारें होय. अग्नि व वायु या तत्त्वांवर हानि आणि आकाश त-त्त्वावर सर्व निष्फल होतें.

पीतःशनिर्मध्यवाहीहनुर्यावद्गुरुध्वनिः ॥ कवो-
ष्णःपार्थिवोवायुःस्थिरकार्यप्रसाधकः ॥ १६४ ॥

अर्थ–पीतवर्ण, हळू चालणारा, हनुवटीपर्यंत खालीं वर न लागतां मध्य स्थितीनें वाहणारा व मोठा शब्द करणारा आणि किंचित् उष्ण असा जो श्वास वायु तो स्थिरकार्य सिद्धि करणारा पार्थिव ( पृथ्वी-संबंधी ) वायु होय.

अधोवाहीगुरुध्वानःशीघ्रग.शीतलःस्थितः ॥ यः
षोडशांगुलोवायुःसआपःशुभकर्मकृत् ॥ १६५ ॥

अर्थ–खालीं वाहणारा, मोठा शब्द करणारा, शीघ्रगति, शीतळ व सोळा अंगुळें ज्याचें परिमाण तो आप ( उदकसंबंधी ) वायु होय. तो शुभकर्माची सिद्धि करणारा होय.

आवर्त्तगश्चात्युष्णश्चशोणाभश्चतुरंगुलः ॥
ऊर्ध्ववाहीचयःक्रूरकर्मकारीसतैजसः ॥ १६६ ॥

अर्थ–भोंवऱ्याप्रमाणें चालणारा, अति उष्ण, रक्तवर्ण व चार अंगुलें ऊर्ध्व वाहणारा जो तैजस वायु, तो क्रूरकर्मांत सिद्धि देणारा होय.

उष्णःशीतःकृष्णवर्णस्तिर्यग्गाम्यष्टकांगुलः ॥
वायुः पवनसंज्ञस्तुचरकर्मप्रसाधकः ॥ १६७ ॥

अर्थ–शीतोष्ण, कृष्णवर्णाचा, वांकडा व आठ अंगुलें वाहणारा जो श्वास वायु श्वास जाणावा. हा चरकार्यांच्या सिद्धीस उक्त होय.

यःसमीरःसमरसःसर्वतत्त्वगुणावहः ॥ आंबरंतं विजानीयात्योगिनांयोगदायकम् ॥ १६८ ॥

अर्थ–जो वायु समरस असतो, ज्यांत सर्व तत्त्वाचे गुण मिश्रित असतात तो आकाशसंबंधी श्वास होय. त्यावर योगाची सिद्धि होय.

पीतवर्णंचतुष्कोणंमधुरंमध्यमाश्रितं ॥ भोगदंपार्थिवंतत्त्वंप्रवाहेद्वादशांगुलम् ॥ १६९ ॥

अर्थ–पृथ्वी तत्त्व रंगानें पिंवळें, आकृतीनें चतुष्कोण, चवीनें मधुर, मध्यस्थानीं वाहणारें, परिमाणानें बारा अंगुलें असें आहे, तें अनेक उपभोगदायक असें होय.

श्वेतमर्धेंदुसंकाशंस्वादुकाषायमार्द्रकं ॥ लाभकृद्वारुणंतत्त्वंप्रवाहेषोडशांगुलम् ॥ १७० ॥

अर्थ–श्वेतवर्ण, अर्ध्या चंद्राच्या आकाराचें, तुरट, आलें आणि प्रवाहीं सोळा अंगुळें तें वारुण ह्मणजे जलतत्त्व होय. या तत्त्वापासून लाभ होतो.

रक्तंत्रिकोणंतीक्ष्णंचऊर्ध्वभागप्रवाहकं ॥ दीप्तंचतैजसंतत्त्वंप्रवाहेचतुरंगुलं ॥ १७१ ॥

अर्थ–तेज तत्त्व हें आरक्तवर्ण, त्रिकोण, तिखट, ऊर्ध्व भागीं वाहणारें, देदीप्यमान, आणि प्रवाहांत चार अंगुळें असें आहे.

नीलंचवर्तुलाकारंस्वादाम्लंतिर्यगाश्रितम् ॥ चपलंमारुतंतत्त्वंप्रवाहेऽष्टांगुलंस्मृतम् ॥ १७२ ॥

अर्थ–वायु तत्त्व हें निळें, आकारानें वर्तुल, स्वादानें अम्ल, वांकडें जाणारें, चपल आणि आठ अंगुलें वाहणारें होय.

वर्णाकारेस्वादवाहेअव्यक्तंसर्वगामिनां ॥ मोक्षदं
नाभसंतत्त्वंसर्वकार्येषुनिष्फलं ॥ १७३ ॥

अर्थ-वर्ण, आकार, स्वाद व वाहण्याची गति या चारी प्रकारांनीं अस्पष्ट जें आकाश तत्त्व तें सर्व प्रवृत्ति कार्यास निष्फळ करणारें होय. एक मोक्ष-कृत्यास मात्र हें साधक होतें.

पृथ्वीजलेशुभेतत्त्वेतेजोमिश्रफलोदयम्॥हानिमृ-
त्युकरौपुंसामशुभौव्योमारुतौ ॥ १७४ ॥

अर्थ-पृथ्वी आणि जल हीं तत्त्वें शुभ होत, तेजमिश्र ( मध्यफल ) होय. वायु आणि आकाश हीं तत्त्वें हानि व मृत्यु करणारीं पुरुषांना अत्यंत अशुभ होत.

आपूर्वपश्चिमेपृथ्वीतेजश्चदक्षिणेतथा ॥ वायुश्चोत्त-
रदिग्ज्ञेयोमध्येकोणगतंनभः ॥ १७५ ॥

अर्थ-पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत पृथ्वी तत्त्व, दक्षिणेस तेज तत्त्व, उत्तरदिशेस वायु तत्त्व, आणि मध्य दिशेस आकाश तत्त्व, याप्रमाणें हीं तत्त्वें दिशा व्यापून राहतात.

चंद्रेपृथ्वीजलेस्यातांसूर्येऽग्निर्वायदाभवेत् ॥ तदा
सिद्धिर्नसंदेहःसौम्यासौम्येषुकर्मसु ॥ १७६ ॥

अर्थ-चंद्रस्वरांत पृथ्वी व जल, आणि सूर्यस्वरांत अग्नि हीं तत्त्वें चालू असतात, तेव्हां क्रमानें सौम्य व क्रूर कार्यांचे ठायीं सिद्धि होते, यांत संशय नाहीं.

लाभःपृथ्वीकृतोऽह्निस्या-न्निशायांलाभकृज्जलं ॥ व-
न्हौमृत्युःक्षयोवायुर्नभःस्थानंदहेत्क्वचित् ॥ १७७ ॥

अर्थ-पृथ्वीतत्त्वावरून लाभ होणारा दिवसां होतो. जलतत्त्व रात्रीं

लाभदायक होय, अग्नितत्त्वावर मृत्यु, वायु तत्त्वावर क्षय, आणि आकाश तत्त्वावर स्थानदाह होतो.

जीवितव्यजयेलाभेकृष्यांचधनकर्मणि ॥
मंत्रार्थेयुद्धप्रश्नेचगमनागमनेतथा ॥ १७८ ॥

**अर्थ**–जीवित, जय, लाभ, कृषि, धनकर्मी, मंत्रार्थ, युद्धकर्म, प्रश्न, गमन, व आगमन इत्यादि कर्मांचेठायीं पृथ्वी तत्त्व शुभ होय.

आयातिवारुणेतत्त्वेशत्रुरस्तिशुभंक्षितौ ॥ प्रयाति
वायुतोऽन्यत्रहानिमृत्यूनभोऽनले ॥ १७९ ॥

**अर्थ**–शत्रु आला असतां पृथ्वी व आप हीं तत्त्वें शुभकारक होत. वायुतत्त्वावर शत्रु आल्यास दुसरीकडे जातो. आकाश व अग्नि या तत्त्वांवर शत्रु आल्यास हानि व मृत्युदायक होय.

पृथिव्यांमूलचिंतास्याज्जीवस्यजलवातयोः ॥ तेज-
साधातुचिंतास्याच्छून्यमाकाशतोवदेत् ॥ १८० ॥

**अर्थ**–कोणी पृच्छक पुसावयास आला तर त्याच्या मनांतील चिंता तत्त्वावरून पहावी. पृथ्वी तत्त्वावर मूल-चिंता ( वृक्षादिकांची चिंता ) आहे. जल आणि वायु तत्त्वावर जीवचिंता व तेज तत्त्वावर धातुचिंता आहे व आकाश तत्त्वावर शून्य ह्मणजे कांहीं चिंता नाहीं.

पृथिव्यांबहुपादाःस्युर्द्विपदस्तोयवायुतः ॥ तेजस्ये-
वचतुष्पादोनभसापादवर्जितः ॥ १८१ ॥

**अर्थ**–पृथ्वीतत्त्वावर पुष्कळ पायांनीं ( पुष्कळ सोबत्यांबरोबर ) गमन करावें; पाणी आणि वायु या तत्त्वांवर दोन पायांनीं [ एकट्यानें ] जावें. तेजतत्त्वावर चार पायांनीं [ दोघांनीं ] जावें; आकाश तत्त्वावर मुळीं कोठें कोणी जाऊं नये.

कुजोवन्हीरविःपृथ्वीसौरिरापः प्रकीर्त्तितः ॥ वायु-
स्थानस्थितोराहुर्दक्षरंध्रप्रवाहकः ॥ १८२ ॥

अर्थ-दक्षिणनाडी वाहत असतां अग्नितत्त्व वाहतें तो मंगळ, पृथ्वीतत्त्व तो सूर्य, उदक तो शनि आणि वायु तो राहु जाणावा.

जलंचंद्रोबुधःपृथ्वीगुरुर्वातःसितोऽनलः ॥ वामनाड्यांस्थिताःसर्वेसर्वकार्येषुनिश्चिताः ॥ १८३ ॥

अर्थ-वामनाडींत ( इडेंत ) जलतत्त्व तो चंद्र, पृथ्वीतत्त्व तो बुध, वायु तो गुरु, आणि अग्नितत्त्व तो शुक्र होय. हें ग्रह चंद्रस्वरांतील सर्व कार्यांस शुभ होत.

पृथ्वीबुधोजलादिंदुःशुक्रोवन्हीरविःकुजः ॥ वायूराहुःशनीव्योमगुरुरेवप्रकीर्त्तितः ॥ १८४ ॥

अर्थ-"सुषुम्नानाडींत" पृथ्वीतत्त्व तो बुध, जल तें चंद्र शुक्र, अग्नितत्त्व ते रवि मंगळ, वायु तत्त्व ते राहु शनि, आणि आकाशतत्त्व तो गुरु असें ह्मणतात.

प्रवासप्रश्नआदित्येयदिराहुर्गतोऽनिले ॥ तदासौचलितोज्ञेयःस्थानांतरमपेक्षते ॥ १८५ ॥

अर्थ-सूर्यस्वरावर कोणी प्रवासाहून येण्याविषयीं प्रश्न केला आणि त्या वेळेस श्वासांत राहुग्रह असेल तर प्रवासी स्थानांतराहून निघाला असें जाणावें.

आयातिवारुणेतत्त्वेतत्रैवास्तिशुभंक्षितौ ॥ प्रवासीपवनेऽन्यत्रमृत्युरेवानलेभवेत् ॥ १८६ ॥

अर्थ-उदक तत्त्वावरप्रश्न केल्यास लवकर येतो, पृथ्वीतत्त्वावर विचारिल्यास जेथें गेला असेल तेथेंच सुखी आहे. वायु तत्त्वावर प्रवासी अन्यस्थानीं गेला, आणि अग्नितत्त्वावर मृत्यु प्राप्त झाला असें जाणावें.

पार्थिवेमूलविज्ञानंशुभंकार्यंजलेतथा ॥ आग्नेयेधातुविज्ञानंव्योम्निशून्यंविनिर्दिशेत् ॥ १८७ ॥

**अर्थ**-पृथ्वी तत्त्वावर मूलविज्ञान ( वृक्षज्ञान ) जल तत्त्वावर शुभकार्य, अग्नितत्त्वांवर धातुज्ञान व आकाश तत्त्वावर शून्य जाणावें.

तुष्टिपुष्टीरतिःक्रीडाजयहर्षौंधराजले ॥ तेजोवाय्वोश्चसुप्ताक्षोज्वरकंपःप्रवासिनः ॥ १८८ ॥

**अर्थ**-पृथ्वी व उदक या तत्त्वांवर कोणी प्रवाशाविषयीं प्रश्न करील तर प्रवासी संतोष, पुष्टता, प्रीति, व क्रीडा यांनीं युक्त आहे, तेज व वायु यांवर पुसल्यास तो क्रमानें निद्रित व ज्वरित आहे असें जाणावें.

गतायुर्मृत्युराकाशेतत्त्वस्थानेप्रकीर्त्तिताः ॥ द्वादशैताःप्रयत्नेनज्ञातव्यादैशिकैःसदा ॥ १८९ ॥

**अर्थ**-आकाश तत्त्वावर प्रश्न केल्यास मृत्यु जाणावा. याप्रमाणें बारा प्रश्न तत्त्वें दैवज्ञांनीं प्रयत्नानेंच जाणावींत.

पूर्वांयांपश्चिमेयाम्येउत्तरस्यांयथाक्रमम् ॥ पृथिव्यादीनिभूतानिबलिष्ठानिविनिर्दिशेत् ॥ १९० ॥

**अर्थ**-पृथ्वी, आप, तेज आणि वायु हीं तत्त्वें पूर्व, पश्चिम, दक्षिण आणि उत्तर या दिशांस क्रमेंकरून बलिष्ठ होत.

पृथिव्यापस्तथातेजोवायुराकाशमेवच ॥
पंचभूतात्मकोदेहोज्ञातव्यश्चवरानने ॥ १९१ ॥

**अर्थ**-हे सुंदरी, पृथ्वी, पाणी, तेज, वायु आणि आकाश या पंचभूतापासून हा देह उत्पन्न झाला आहे ह्मणून पंचभूतात्मक आहे असें जाणावें.

अस्थिमांसंत्वचानाडीरोमचैवतुपंचमं ॥ पृथ्वीपंचगुणाप्रोक्ताब्रह्मज्ञानेनभाषितं ॥ १९२ ॥

**अर्थ**-हाडें, मांस, त्वचा, नाडी, आणि रोम हे पृथ्वीचे पांच गुण होत असें वेदांत शास्त्रांत सांगितलें आहे.

शुक्रशोणितमज्जाश्चमूत्रंलालाचपंचमम् ॥ आपः
पंचगुणाःप्रोक्ताब्रह्मज्ञानेनभाषितम् ॥ १९३ ॥

अर्थ–वीर्य, रक्त, मज्जा, मूत्र आणि लाळ हे उदकाचे पांच गुण होत.

क्षुधातृषातथानिद्राकांतिरालस्यमेवच ॥
तेजःपंचगुणंप्रोक्तंब्रह्मज्ञानेनभाषितम् ॥ १९४ ॥

अर्थ–क्षुधा, तृषा, निद्रा, कांति व आलस्य हे पांच तेजोगुण होत.

धावनंचलनंग्रंथःसंकोचनप्रसारणे ॥ वायोः
पंचगुणाःप्रोक्ताब्रह्मज्ञानेनभाषितम् ॥ १९५ ॥

अर्थ–धांवणें, चलन, गुंफणें, आखडणें आणि पसरणें हे वायूचे पांच गुण जाणावे.

रागद्वेषौतथालज्जाभयंमोहश्चपंचम. ॥ नभः
पंचगुणंप्रोक्तंब्रह्मज्ञानेनभाषितम् ॥ १९६ ॥

अर्थ–राग ( प्रीति,) द्वेष, लज्जा, भय आणि मोह हे आकाशाचे पांच गुण होत.

पृथ्व्याःपलानिपंचाशच्चत्वारिंशत्तथांभसः ॥ अग्ने-
स्त्रिंशत्पुनर्वायोर्विंशतिर्नभसोदश ॥ १९७ ॥

अर्थ–पृथ्वी ५० पळें, उदक ४० पळें, अग्नि ३० पळें, वायु २० पळें आणि आकाश १० पळें वाहतें. याप्रमाणें पंचतत्त्वें २॥ घटिकांत वाहतात.

पृथिव्यांचिरकालेनलाभश्चापःक्षणाद्भवेत् ॥ जाय-
तेपवनेस्वल्पःसिद्धोऽप्यग्नौविनश्यति ॥ १९८ ॥

अर्थ–पृथ्वीतत्त्वावर चिरकालानें लाभ होतो. उदक तत्त्वावर तत्क्षणीं होतो, वायु तत्त्वावर स्वल्प लाभ होतो, अग्नि तत्त्वावर लाभ सिद्ध झाला असला तर नाहींसा होतो.

पृथ्व्याःपंचह्यपांवेदागुणास्तेजोद्विवायुतः ॥
नभस्येकगुणश्चैवतत्त्वज्ञानमिदंभवेत् ॥ १९९ ॥

अर्थ-पृथ्वी पंचगुणात्मक, उदक चतुर्गुण, तेज त्रिगुणात्मक, वायूंत दोन गुण, आणि आकाशांत एक गुण जाणावा.

फूत्कारकृत्प्रस्फुटिताविदीर्णापतिताधरा ॥
ददातिसर्वकार्येषुअवस्थासदृशंफलम् ॥ २०० ॥

अर्थ-फूत्कार करणारी, फुटलेली, विदीर्ण झालेली, आणि पडलेली अशी पृथ्वी सर्व कार्यांत आपल्या अवस्थेप्रमाणें फल देते.

धनिष्ठारोहिणीज्येष्ठानुराधाश्रवणंतथा ॥ अभि-
जिदुत्तराषाढापृथ्वीतत्त्वमुदाहृतं ॥ २०१ ॥

अर्थ-धनिष्ठा, रोहिणी, ज्येष्ठा, अनुराधा, श्रवण, अभिजित,उत्तराषाढा, हीं नक्षत्रें पृथ्वी तत्त्वांतील जाणावीत.

पूर्वाषाढातथाश्लेषामूलमार्द्राचरेवती ॥ उत्तराभा-
द्रपदातोयंतत्त्वंशतभिषक्प्रिये ॥ २०२ ॥

अर्थ-पूर्वाषाढा, आश्लेषा, मूळ, आर्द्रा, रेवती, उत्तराभाद्रपदा आणि शततारका या नक्षत्रांवर उदक तत्त्व जाणावें.

भरणीकृत्तिकापुष्योमघापूर्वाचफाल्गुनी ॥ पूर्वाभा-
द्रपदास्वातीतेजस्तत्त्वमितिप्रिये । २०३ ॥

अर्थ-भरणी,कृत्तिका, पुष्य, मघा, पूर्वा, फाल्गुनी, पूर्वाभाद्रपदा आणि स्वाती हें तेजतत्त्व जाणावें.

विशाखोत्तरफाल्गुन्योहस्तचित्रेपुनर्वसु ॥ अश्वि-
नीमृगशीर्षेचवायुतत्त्वमुदाहृतं ॥ २०४ ॥

अर्थ-विशाखा, उत्तरा, हस्त, चित्रा, पुनर्वसु, अश्विनी व मृग हें वायुतत्त्व होय.

